**महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा प्रकल्पासाठी समिती स्थापन करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः ईएमएस २०१८/प्र.क्र.२७०/आरोग्य ३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
तारीख: ०३ जानेवारी, २०१९.

**वाचा :**

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस २०११/प्र.क्र. २२४/आरोग्य ३, दिनांक २८.३.२०१३.**

**प्रस्तावना :**

कोणत्याही प्रकारच्या आपत्कालीन परिस्थितीमध्ये आपद्ग्रस्तास आवश्यक ती वैद्यकीय सुविधा पहिल्या सुवर्ण तासामध्ये मिळण्याकरीता शासनामार्फत महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा प्रकल्प (एमईएमएस) प्रकल्प राबविण्यात येत आहे. संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मे.बीव्हीजी इंडिया लि. या यशस्वी निविदाकाराला कार्यारंभ आदेश देण्यात आले आहेत. सदर पुरवठादाराबरोबर केलेल्या ५ वर्षाच्या करारनामाची मुदत ०१ फेब्रुवारी,२०१९ रोजी संपत आहे. मा.राज्यमंत्रिमंडळाच्या मंगळवार, दि.११ डिसेंबर,२०१८ च्या बैठकीत सदर करारास मुदतवाढ देणे/नविन करार करणे यासंदर्भात अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करुन समितीने याबाबत १५ दिवसात निर्णय घ्यावा असे निर्देश मा.मंत्रिमंडळाने दिले आहेत. त्यानुसार सदर करारास मुदतवाढ देणे अथवा नव्याने सेवापुरठादाराची नेमणूक करणे यासाठी विचारविनिमय करुन शासनास शिफारस करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा प्रकल्पासंदर्भात सेवापुरवठादारासोबत करण्यात आलेल्या करारास मुदतवाढ देणे अथवा नविन सेवापुरवठादाराची नेमणूक करणे याकरीता शासनास शिफारस करण्यासाठी पुढीलप्रमाणे समिती स्थापन करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**समिती :-**

| | | |
|---|---|---|
| १) | अपर मुख्य सचिव, (वित्त), वित्त विभाग | - अध्यक्ष |
| २) | अपर मुख्य सचिव, (नियोजन), नियोजन विभाग | - सदस्य |
| ३) | प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | - सदस्य |
| ४) | प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग | - सदस्य |
| ५) | प्रधान सचिव, (उद्योग ),उद्योग, उर्जा व कामगार विभाग | - सदस्य |
| ६) | प्रधान सचिव, (परिवहन), गृह विभाग | - सदस्य |
| ७) | प्रधान सचिव,(माहिती- तंत्रज्ञान),सामान्य प्रशासन विभाग | - सदस्य |
| ८) | आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई | - सदस्य सचिव |
| ९) | पोलिस महासंचालक,मुंबई | - सदस्य |
| १०) | परिवहन आयुक्त, मुंबई | - सदस्य |

२. सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहिल.

१) महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा प्रकल्प योजना राज्यात राबविण्यासाठी सेवा पुरवठादाबरोबर करण्यात आलेल्या करारास मुदतवाढ देणे अथवा नविन सेवा पुरवठादार नेमूण नविन करार करण्याबाबत शिफारस करणे .

२) सध्याच्या सेवा पुरवठादारास मुदतवाढ द्यावयाची असल्यास ती खालील बाबींच्या आधारे देण्याबाबत विचार करणे

अ) सध्याच्या करारातील महत्वाच्या तरतुदींचा आढावा घेऊन त्यामध्ये सुधारणा करणे किंवा नविन अटी/ शर्ती/तरतुदी समाविष्ट करणे.

ब) सदर प्रकल्पावर प्रत्यक्षपणे होणारा खर्च व सेवापुरवठादारास अदा करण्यात येणारे देयक यामधील तफावतीचा अभ्यास करणे.

क) प्रत्यक्ष खर्चावर आधारीत व सेवापुरवठादारास केवळ सेवाशुल्क अदा करण्याच्या प्रस्तावावर विचार करणे.

३) शासनामार्फत (आरोग्य सेवा संचालनालय)सदर प्रकल्प राबविणे शक्य आहे काय याचा अभ्यास करणे.

४) नविन सेवा पुरवठादाराची नेमणूक करण्यासाठी स्वीस चॅलेंजच्या आधारे /RFP तयार करुन त्याला मान्यता देणे.

सदर समितीने आपला अहवाल १५ दिवसात सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२८१८०३१४७८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2019.01.03 15:14:57 +05'30'

**( रो.दि.कदम पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (वित्त/नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा.मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, (नियोजन ),नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, (उद्योग ),उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव, (परिवहन) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव,(माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग मंत्रालय, मुंबई.
१२.महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), मुंबई.
१३.महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), नागपूर.
१४.आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, मुंबई.
१५. पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य ,मुबई
१६.आयुक्त, परिवहन, वांद्रे(पुर्व), मुंबई.
१७.संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
१८. सह संचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई.
१९.निवडनस्ती (कार्यासन आरोग्य ३).